**सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य या योजनेसाठी स्वतंत्र बँक खाते उघडण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीएफएम-२०२४/प्र.क्र.६१(भाग-२)/२-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०२४.

**वाचा:**
१) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.पीएफएमएस-२०१७/प्र.क्र.४५/२अे, दि.२७.०९.२०१७.
२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.पीएफएमएस-२०१७/प्र.क्र.४५/२अे, दि.१८.०३.२०२१.
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१ / प्र.क्र.३५ / कोषा प्रशा-४, दि.०१.०७.२०२१.
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१ /प्र.क्र.८४ /कोषा प्रशा-५, दि.१५.०९.२०२१ व दि.०७.१०.२०२१.
५) राज्य वित्तीय व्यवस्थापन प्रणाली, केंद्रीय अर्थ मंत्रालय, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन आदेश क्र.एफएम ११/१२९/२०२३, एफएमई (Comp No.३२८७८२), दि.३०.०७.२०२१.
६) केंद्रीय अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे कार्यालयीन आदेश क्र.एफएम ११/१२४/२०२१, एफएमई, दि.१६.०३.२०२३.
७) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४५/४-अे, दि.२९.०७.२०२४.
८) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.विप्र-३/कापूस व सोयाबीन/आ.स./२०२४/२१३(र), दि.०६.०८.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस, सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना ०.२ हेक्टरपेक्षा कमी क्षेत्रासाठी सरसकट रु.१०००/- तसेच ०.२ हेक्टरपेक्षा जास्त क्षेत्रासाठी त्यांच्या क्षेत्रानुसार प्रति हेक्टर रु.५०००/- (२ हेक्टरच्या मर्यादेत) अर्थ सहाय्य देण्याबाबत, मा.उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांनी सन २०२४ च्या अतिरिक्त अर्थसंकल्पीय भाषणामध्ये घोषणा केली आहे. याबाबत कापूस उत्पादक शेतकऱ्यांसाठी रु.१५४८.३४ कोटी आणि सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांसाठी रु.२६४६.३४ कोटी असे एकूण रु.४१९४.६८ कोटी अर्थसहाय्य वितरीत करावयाच्या दि.११ जुलै, २०२४ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून, त्या अनुषंगाने दि.२९ जुलै, २०२४ च्या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २४०१बी४१९ याखाली रु.४१९४.६८ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. सबब, सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकरी लाभार्थ्यांच्या आधार लिंक बँक खात्यामध्ये थेट लाभ हस्तांतरण (DBT) माध्यमातून अर्थसहाय्य देण्याकरिता राष्ट्रीयीकृत बँकेत नवीन बचत खाते

उघडण्यास तसेच बँकेचे आर्थिक व्यवहार हाताळण्याकरिता मेकर व चेकरची भूमिका सोपविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस व सोयाबीन उत्पादक शेतकरी लाभार्थ्यांच्या आधार लिंक बँक खात्यामध्ये थेट लाभ हस्तांतरण (DBT) माध्यमातून अर्थसहाय्य देण्याकरिता नवीन बचत खाते "स्टेट बँक ऑफ इंडीया" या राष्ट्रीयकृत बँकेत आयुक्त (कृषि) यांचे नावे उघडण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच उघडण्यात आलेल्या बँक खात्यातील आर्थिक व्यवहार हाताळण्यासाठी कृषि आयुक्तालयातील संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना मेकर आणि आयुक्त (कृषि) यांना चेकर म्हणून नियुक्ती करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग संदर्भ क्र. ३ येथील दि.०१.०७.२०२१ च्या शासन निर्णय व संदर्भ क्र.४ येथील दि.१५.०९.२०२१ व दि.०७.१०.२०२१ च्या परिपत्रकामधील नमुद तरतुदीस अनुसरुन व खालील अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

(१) सन २०२३ च्या खरीप हंगामामधील कापूस, सोयाबीन उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य याकरिता प्राप्त होणारा निधीचा खर्च केवळ त्याच प्रयोजनाकरिता करण्यात यावा.

(२) उक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेला आलेला निधी/व्याज तसेच योजनेच्या कामांच्या प्रगतीनुसार लागणाऱ्या निधीचा वेळोवेळी आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल सादर करावा.

(३) सदर बचत बँक खात्यावरील व्याजाची रक्कम तसेच शिल्लक रक्कम याचा ताळमेळ घेऊन निश्चित होणारी रक्कम शासकीय लेख्यामध्ये जमा करावी.

(४) सदर बँक खात्यात दिर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही याद्दष्टीने तात्काळ विनियोजनासाठी आवश्यक असेल त्याचवेळी कोषागारातून निधी आहरित करण्यात यावा.

(५) योजना बंद झाल्यास त्या योजनेचे खाते बंद करण्यात यावे. सदरची जबाबदारी आयुक्त स्तरावर आयुक्त (कृषि) यांची असेल.

(६) उपरोक्त (२) प्रमाणे व्यवहार होत असल्याने, कोणत्याही परिस्थितीत चेकबुकचा वापर होणार नाही. त्यामुळे सदर खाते विना चेकबुकचे असल्याबाबत लेखी आदेश सर्व संबंधितांनी त्यांच्या स्तरावरुन बँकेस द्यावेत.

(७) सदर खात्यातून रोख अथवा चेकबुक अथवा विदड्रावल स्लिप (Withdrawal Slip) या मार्गाने व्यवहार करण्यावर बंदी घालण्यात येत आहे.

(८) आयुक्त (कृषि) स्तरावर आवश्यकतेनुसार विदड्रावल (Withdrawal) ही सुविधा उपलब्ध असेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१४१६३८१७०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2024.08.14 16:53:32 +05'30'

**( संतोष कराड )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
१४. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे.
१५. कृषि सहसंचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई,
१७. सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१९. महालेखाकापाल कार्यालय, मुंबई /नागपूर-१/२, महाराष्ट्र.
२०. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (४-अे ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे.
२२. वित्त विभाग (व्यय-२/अर्थ-१३/कोषा प्रशा-४ व ५), मंत्रालय, मुंबई.
२३. लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे.
२४. व्यवस्थापक, स्टेट बँक ऑफ इंडीया, पुणे.
२५. निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).